किमान आधारभूत योजना (Price Support Scheme) अंतर्गत खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी राज्यस्तरीय नोडल संस्था निश्चित करण्यासंदर्भात सर्वसमावेशक निकष / कार्यप्रणाली ठरविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०२५/प्र.क्र. २३/२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक: - १७ फेब्रुवारी, २०२५

**शासन निर्णय**

केंद्र सरकारच्या PM-AASHA योजनेअंतर्गत ( MSP, PSF, PSS ) शेतमालाच्या खरेदीसंदर्भात केंद्रीय कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाने ऑक्टोंबर २०१८ मध्ये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांनुसार किमान आधारभूत योजना ( Price Support Scheme) अंतर्गत एकूण कृषी उत्पादनाच्या २५ टक्के उत्पादन किमान आधारभूत दराने करण्यात येते. सदरहू योजनेअंतर्गत केंद्र शासनाच्या नाफेड व एनसीसीएफ या नोडल एजन्सीद्वारा राज्यस्तरीय नोडल संस्थांमार्फत खरेदी प्रक्रिया राबविण्यात येते.

२. किमान आधारभूत योजनेंतर्गत शेतमालाच्या हमीभावाने खरेदी करताना काही राज्यस्तरीय नोडल संस्थांनी त्यांच्या अधिनस्त विविध फार्मस पोड्युसर कंपन्याना खरेदी केंद्र सुरु करण्यासाठी पैशांची मागणी तसेच केंद्रातील खरेदी प्रक्रियेचा मोबदला अडवून त्यासाठी पैशाची मागणी करणे, खरेदी केंद्रामध्ये गैरकायदेशीर पैशाची कपात करणे तसेच काही नोडल संस्थांच्या संचालक मंडळात एकाच कुटुंबातील एकापेक्षा जास्त व्यक्तिंचा समावेश असणे इत्यादी बाबी निदर्शनास आल्या आहेत. या सर्व बाबींचा विचार करता सदरहू योजनेची राज्यात अंमलबजावणी करणेसाठी राज्यस्तरीय नोडल संस्था निश्चित करण्याकरीता एक सर्वसमावेशक निकष / कार्यप्रणाली अवलंबविणे आवश्यक आहे. यासंदर्भात अभ्यास करुन सर्वसमावेशक धोरण / कार्यप्रणाली निश्चित करण्यासंदर्भात शासनास शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) व्यवस्थापकीय संचालक,<br>महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई | - | अध्यक्ष |
| २) राज्यप्रमुख, नाफेड, मुंबई | - | सदस्य |
| ३) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य,पुणे | - | सदस्य |

४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे - सदस्य

५) श्री.सुनिल पवार, सेवानिवृत्त पणन संचालक, पुणे - सदस्य

६) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई - सदस्य सचिव

उपरोक्त समितीने आपल्या शिफारशीसह सविस्तर अहवाल १ महिन्यात शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०२१७१३१३३२९२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANGITA DINESH SHELKE

Digitally signed by SANGITA DINESH SHELKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=9ace0ca0b129ab4da8f9e911057d75e7fbf6f6bd0b55e8ff7ca0deacfa15e1c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A16A0B4000A30DD7389BEC31D153FB1F2D63557A5E779E513EF76643F6613183, cn=SANGITA DINESH SHELKE
Date: 2025.02.17 13:14:22 +05'30'

**( संगिता शेळके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई,
३. श्रीमती भाव्या आनंद, राज्यप्रमुख, नाफेड, नमन सेंटर, ए -वींग, बांद्रा कुर्ला कॉम्पलेक्स, मुंबई
४. श्री. विकास रसाळ, पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. श्री. संजय कदम, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
६. श्री.सुनिल पवार, सेवानिवृत्त पणन संचालक, पुणे
७. सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई
८. प्रधान सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. उप सचिव (पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.